**इंदिरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.),जिल्हा नाशिक या संस्थेचा भुखंड गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**

**शासन निर्णय क्र.घबांक-१६१८/प्र.क्र.२३९२ /१९-स**

न्यु इंडीया ॲश्युरन्स बिल्डिंग, ३ रा मजला,

महात्मा गांधी मार्ग ,बँक ऑफ इंडीयासमोर मुंबई ४०० ००१

दिनांक:- १६ फेब्रुवारी,२०१९

**संदर्भ -:** १) शासन निर्णय क्रमांक एचएसजी-११७२/१८८/एच.सी.
दिनांक १८/०२/१९७८,०६/०१/१९७९ व १७/०४/१९७९

२) शासन निर्णय क्र.एचएसजी १०६७/XXIV/ ६ १९डिसेंबर ६७

३) संस्थेचा प्रस्ताव दिनांक २८/११/२०१८

**प्रस्तावना -:**

**इंदिरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), जिल्हा नाशिक** या संस्थेचा गृहबांधणी कर्जाचा प्रस्ताव मंजूर करून शासनाने एकुण १४ पात्र सभासदांना संदर्भ क्र.१ येथील एकुण तीन शासन निर्णयान्वये एकूण कर्ज रु.३,२३,२९०/- ( रु. तीन लाख तेवीस हजार दोनशे नव्वद फक्त) इतके कर्ज वितरीत करण्यात आले होते. योजनेच्या अटी व शर्तीनुसार कर्जाच्या पहील्या हप्त्यांचे प्रदान झाल्यानंतर संस्थेने, त्यांच्या मालकीची सर्व जमीन व त्यावरील बांधकाम केलेल्या सदनिका कर्जाची संपूर्ण परतफेड होईपर्यंत शासनाकडे गहाण ठेवल्या आहेत. संस्थेच्या एकुण १४ कर्जदार सभासदांनी त्यांना वितरीत केलेली कर्जाची रक्कम त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे. तसेच सर्व सभासदांना निर्गमित केलेल्या ना-देय प्रमाणपत्रावरुन कर्ज व त्यावरील व्याजाची वसुली झाल्याचे या कार्यालयातील नोंदीवरुन दिसुन येत आहे.संस्थेकडे शासनाचे येणे बाकी नसल्यामुळे संस्थेचा भुखंड गहाणखतातुन मुक्त करण्याचा संस्थेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर बाब विचारात घेऊन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

**शासन निर्णय -:**

**इंदिरा सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), जिल्हा नाशिक** या संस्थेच्या एकुण १४ सभासदांना वितरीत करण्यात आलेले गृहबांधणी कर्ज रुपये ३,२३,२९०/-(रुपये तीन लाख तेवी हजार दोनशे नव्वद फक्त) व त्यावरील व्याजाची रक्कम याप्रमाणे संपुर्ण रक्कम शासनास परतफेड केली आहे, सदर संस्थेकडे शासनाचे कोणतेही येणे बाकी नसल्याने संस्थेने शासनाकडे गहाण ठेवलेला मुक्काम पोस्ट नाशिक, जिल्हा नाशिक येथील गट क्रंमांक ४३२/३/१ मधील खालीलप्रमाणे चतु:सिमा असलेला ५३,३६१ चौरस फुट क्षेत्रफळ असलेला संस्थेचा भुखंड व त्यावरील बांधकाम गहाणखतातुन मुक्त करण्यात येत आहे.

पुर्वेकडे : शासकीय रोड आणि रोड विस्तारणाकरीता आरक्षीत जागा

| | | |
|---|---|---|
| पश्चिमेकडे | : | गट क्रमांक ४३१ |
| उत्तरेकडे | : | गट क्रमांक ४३२/३/२ |
| दक्षिणेकडे | : | गट क्रमांक ४३० |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१८१६५२३२५३०२ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

ASHOK SHANKAR BHUJBAL

Digitally signed by ASHOK SHANKAR BHUJBAL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa
9581722, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=fdb9a467c1125b3a23797088f3433a330c41502619eaa43bd29
e751716ff3946, ou=CO OPERATION TEXTILE AND MARKETING DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ASHOK SHANKAR BHUJBAL
Date: 2019.02.18 16:54:31 +05'30'

**( अ.शं.भुजबळ )**
**कक्ष अधिकारी ,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती)
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुबई.
५. सहकार आयुक्त व निबधक, सहकारी संस्था, पुणे.
६. संचालक, विमा संचालनालय, मुंबई गृहनिर्माण भवन (म्हाडा), खोली क्र.२६४, पहिला माळा, बांद्रे (पुर्व), मुंबई-४०० ०५१
७. जिल्हाधिकारी, नाशिक
८. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था नाशिक
९. जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, नाशिक
१०.अध्यक्ष / सचिव, इंदिरा गृहनिर्माण संस्था मर्या., जिल्हा नाशिक
११.निवडनस्ती १९-स